## लोकशक्ति-जागरण व सर्वोदय चळवळ

विनोबांचे भूदान-ग्रामदान आंदोलन हा लोकशक्तीच्या जागरणाचा महान उपक्रम होता. सात-आठ वर्षांच्या अवधीत तो उत्तरोतर क्षीण होत गेला आणि पुढे जवळपास पूर्णपणे विरून गेला. असे का झाले? सर्वोदयाच्या विचारावर निष्ठा ठेवून काम करणारे देशभर शेकडो कार्यकर्ते आजही आहेत आणि तरीही लोकशक्ती जागरणात पाऊल विशेष पुढे पडत नाही, असे कां?

**प्रभावाचा अभाव**

सर्वोदय चळवळीतल्या अनेक आदरणीय नेत्यांना हे प्रश्न उपस्थित करणे गैरलागू वाटेल, लोकशक्ती जागरण चांगले होत आहे असे ते म्हणतील याची मला कल्पना आहे. अलीकडील काही उपक्रमांची, देशांत काही ठिकाणी चाललेल्या सघन कार्यांची उदाहरणेही समोर ठेवली जाऊ शकतात याचीही मला कल्पना आहे. सर्वोदयाच्या चळवळीत सहभागी नसलेल्या व्यक्तींना सर्वोदय ही एक शक्ती आहे असे देशव्यापी पातळीवर जाणवत नाही असे म्हटले तर वावगे होणार नाही. सर्वोदय चळवळ शक्तिमान असेल (तर तिचा आघात कोठे दृग्गोचर व्हावयास हवा? राजकीय जीवनात, असे याचे एक उत्तर असेल. भ्रष्टाचार, अन्याय, अत्याचार फोफावणे अवघड होत चाललेले दिसावयास हवे, असे म्हणता येईल. देशाच्या विकासासाठी पर्यायी सर्वोदयी नीती व धोरणे त्यांचा अंगिकार करण्याच्या दिशेने जनमताचा रेटा निर्माण होत आहे असेही दिसले पाहिजे. या कसोट्यांवर सर्वोदय चळवळीला तटस्थ परीक्षक पास करील का? 'नाही', असे याचे प्रामाणिक उत्तर द्यायला लागेल असे मला वाटते.

शक्तिप्रदर्शनाची अलीकडच्या काळातली दोन ठळक उदाहरणे तर आपल्या परिचयाची आहेत. शरद जोशींनी उभे केलेले शेतकरी संघटन आणि उत्तरेत महेंद्रसिंग टिकैत यांनी उभी केलेली किसान-शक्ती तपशीलवार यादी करावयास बसले तर अशी लहान- मोठी उदाहरणे इतर पुष्कळ सांगता येतील. इथे ही दोन मोठी उदाहरणे पुरेशी आहेत. या दोन नेत्यांनी लोकशक्ती जागृत केली आहे व त्यांनी स्वतःसाठी आखून घेतलेल्या चौकटींमध्ये व्यापक राजकारणावर व धोरणावर जाणवण्याइतका आघातही करण्यात यश मिळविलेले आहे.

'सौम्य, सौम्यतर, सौम्यतम सत्याग्रहाची भाषा विनोबांनी केली. स्वातंत्र्यपूर्व काळातील गांधींच्या नेतृत्वाखालील लढेही त्यांनी एकप्रकारे दोषपूर्ण, म्हणून 'नियमबाह्य' ठरविले. तेव्हा शक्तिप्रदर्शन रूढ अर्थाने व रूढ साधनमार्गांचा अवलंब करून व्हावे अशी सर्वोदय चळवळीकडून अपेक्षा नाही. आजच्या रूढ शक्तिप्रदर्शनामध्ये (गांधीजींच्या कसोट्यांनुसार) काटेकोरपणे पाहिले तर उघड, स्थूल स्वरूपात प्रकट, हिंसा नसते. तेथेही प्रच्छन्न व सूक्ष्म स्वरूपात हिंसाभाव असतोच. नेत्यांना तो अभिप्रेतही असतो. तेव्हा या प्रकारचे शक्तिप्रदर्शन सर्वोदय विचाराशी मेळ खाणारे असणार नाही ही गोष्टही स्पष्ट आहे.

**लोक-चळवळ बनण्यात अपयश**

मुद्दा लोकशक्ती जागरणाचा, व्यापक आघात करता येण्याचा आणि मूलगामी परिवर्तनाचा आहे आणि मुख्य मर्यादा आज जाणवते ती अशी की, कार्यकर्त्यांची चळवळ ही लोकांची चळवळ बनलेली माही. भूदान-ग्रामदान आंदोलनाच्या ऐन उत्कर्षाच्या काळातही ती कोठेच ठळकपणे लोकांची चळवळ बनली नाही. गांधीजींच्या लढ्यांमध्येही नेते व कार्यकर्ते यांच्या भूमिका महत्त्वाच्या होत्या. पण १९२०-२२, १९३०-३४, १९४२ या तिन्ही चळवळी लोकचळवळी होत्या यात शंका नाही. त्या योग्य मर्यादेत व वळणावर राखण्याचे गंभीर पेचप्रश्न म्हणूनच दरवेळी उपस्थित झाले. गांधींना या पेचप्रश्नांची सोडवणूक समाधानकारकपणे करता आली नाही. भूदान-ग्रामदान आंदोलनात या प्रकारचा पेच कधीच उपस्थित झाला नाही. आंतरिक उणीवा व दोष, प्रमाद यांच्यामुळे ती चळवळ क्षीण होत गेलो. कोणतीही नवी चळवळ ही कार्यकत्यांच्या सहाय्याने नेता वा नेते उभारत असतात, कारण चळवळीला वैचारिक अधिष्ठान असावे लागते. लोकांमधून उस्फूर्त 'चळवळ' उत्पन्न होते तिचे स्वरूप उद्रेकाचे, बंडाचे असते. नेते-कार्यकर्ते यांनी उत्पन्न केलेली चळवळ नेतृत्वविहीन न होता लोकचळवळीत परिणत होणे निर्णायक महत्त्वाचे आहे.

पुष्कळदा असे म्हटले जाते की सर्वसामान्य जनतेच्या दैनंदिन ऐहिक जीवनात कोंडी उत्पन्न करणाऱ्या निकडीच्या, स्वतः लोकांना भिडणाऱ्या प्रश्नांच्या आधारेच लोकचळवळ उभी राहू शकते. ही गोष्ट खरीच आहे. अमूक नेत्याच्या मागे गेल्याने, त्याने सांगितलेल्या वाटेने गेल्याने कोंडी फुटणार आहे, प्रश्न मिटणार आहे या आशेने माणसांची मने पल्लवित झाला म्हणजे कार्यकर्त्यांनी चळवळ लोकचळवळ बनते. भूदान-ग्रामदानाचा विचार घेऊन विनोबा व सर्वोदयचे कार्यकर्ते खेडोपाडी पदयात्रा करू लागले तेव्हा काही काळ असे आशेने भारलेले वातावरण देशभर निर्माण झालेले आपण अनुभवले आणि तरीही ती लोकचळवळ बनली नाही. असे का झाले याचे काही विश्लेषण करता येईल, पण येथे ते प्रस्तुत नाही.

आजचे भ्रष्टाचारी शासन लोकांची उत्तरोत्तर जास्तीत जास्त दडपणूक करीत आहे. जीवनाची सर्व क्षेत्रे जशी ते व्यापत आहे तसे लोकांच्या पाठीवरील अन्याय दडपणाचे ओझे वाढत आहे; या कारणाने लोकांमध्ये, सामाजातील विभिन्न विभागांमध्ये असंतोष खदखदत आहे याचा तीव्र प्रत्यय आल्याने १९७४ साली जयप्रकाशांनी बिहारमध्ये होत असलेल्या उद्रेकाचे नेतृत्व ग्रहण केले. व्यापक मूलगामी परिवर्तनाच्या चळवळीत उद्रेकाचे रुपांतर घडवून आणीत असतानाच, दुर्दैवाने, सत्ताधाऱ्यांना खाली खेचण्याच्या, विशेषत: इंदिरा गांधींना धडा शिकविण्याच्या सत्तेच्या राजकारणी चक्रव्यूहात जयप्रकाश चळवळीसह शिरले. तो चक्रव्यूह ते भेदू शकले नाहीत; चक्रव्यूहानेच त्यांना गिळंकृत केले.

सत्तेच्या राजकारणी चक्रव्यूहात न शिरण्याचे पथ्य कां सांभाळावयाचे? तर हा चक्रव्यूह ज्यांनी रचलेला आहे त्यांनी अशा चळवळींचा त्यांच्या त्यांच्या सत्तेच्या राजकारणासाठी वापर करून घेण्यासाठी रचलेला तो मृत्यूचा सापळा आहे म्हणून. कोणत्याही व्यापक परिवर्तनकारी चळवळीला अपरिहार्य व आवश्यक असे राजकीय परिमाण व टोक आजच्या परिस्थितीत असतेच असते हे सत्य नाकारण्याचा प्रश्नच नाही.

**केंद्रबिंदु गाव**

जमीन हाच आजही भारतातल्या अधिकात अधिक लोकांच्या दैनंदिन आर्थिक जीवनात गाभ्याचा मुद्दा आहे. अजूनही सत्तरएक टक्के लोक शेतीवर एकनाएक प्रकारे अवलंबून आहेत आणि खेड्यापाडयातील वस्ती करणाऱ्या लोकांचे प्रमाणही स्थूलमानाने तेच आहे. जमीन म्हणत असताना केवळ शेतजमीन असे म्हणून आज भागणार नाही. जंगलांखालील जमीन, उघडी-बोडकी पडीक जमीन, थोडक्यात भारताची सर्वत्र भूमी चळवळीच्या कक्षेत घेण्याची गरज आहे. पर्यावरणाचे संतुलन राखत, संवर्धन करीत भारतभूमी सुजलाम, सुफलाम करण्याचे आव्हान आज उपस्थित आहे. जोडीला जमिनीच्या विषम वाटपाची, अनेक जण जमिनीपासून वंचित असण्याची जुनी स्थिती कायम आहे. वर्षभर नियमित, निश्चित व पर्याप्त रोजगार मिळण्याचा व रोजगार मिळाल्यास पुरेशी रोजी मिळण्याचा प्रश्न निकडीचा व उग्र बनलेला आहे. औपचारिकत: सरकारी शाळा व दवाखाने यांचे जाळे सार्वत्रिक अंथरलेले आहे, पण शिक्षणाची व आरोग्याची कमालीची व वाढती दुरवस्था आहे. या सर्व क्षेत्रांमध्ये व ग्रामीण भागात शासन आणि सत्तचे राजकारण हे फार मोठे ओझे - पिळवणूक करणारे व दडपणूक करणारे - बनलेले आहे.

लोकशाही जागरणाच्या सर्वोदयी चळवळीचा स्वाभाविक केन्द्रबिंदु खेडे आणि भूमी हाच दिसतो. 'ग्रामदानमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रांती’चा विनोबांचा मंत्र हा आज अधिकच उद्याच्या युगाचा मंत्र आहे असे मनोमन वाटते.

**परिस्थितीतील बदल**

त्याचवेळी, महात्मा गांधी व विनोबा यांच्याइतक्या वा त्यांच्या जवळपास येणाऱ्या नैतिक अधिकाराच्या व्यक्तींचा अपवाद सोडता, पूर्वीच्या पद्धतीच्या पदयात्रांचा व प्रवचनांद्वारा लोकांना आवाहन करण्याने काम होईल असे दिसत नाही. ३०/३५ वर्षांपूर्वी लोक जास्त सश्रद्ध होते, त्यांचा शब्दांवर अधिक विश्वास होता. आज लोक अधिक संशयग्रस्त, सावध झाले आहेत; कोणावरच त्यांचा विश्वास बसत नाही. त्यामुळे स्वतःच्या स्वार्थाचे संपादन बेरकीपणे कसे साधून घेता येईल याकडे जास्त लक्ष असते.

दुसराही एक बदल अलीकडच्या १०/१५ वर्षांमध्ये प्रकर्षाने झाला आहे. बदमाष, गुन्हेगारी व कमालीच्या स्वार्थी प्रवृत्तींचे प्रभुत्व शहरी व ग्रामीण जनजीवनावर प्रस्थापित झाले आहे. तुलनाच करावयाची तर ३० वर्षांपूर्वीच्या धनिक व सत्ताधीश यांच्या अन्याय्य, शोषक, जुलमी व्यवहारांना नाही म्हटले तरी पारंपरिक धार्मिक-सांस्कृतिक चौकटीची नैतिक मर्यादा अधिक होती. आज 'आधुनिकते'च्या प्रभावाखाली बेबंदपणा वाढला आहे. या बदलामुळे, समाजातील ‘आहे’रे वर्गांना आवाहन करण्यातून साधता येणाऱ्या लोकशक्ती जागरणाला व परिवर्तनाला फार मोठया मर्यादा निर्माण झाल्या आहेत. पूर्वीच्या तुलनेत समाज अधिक खोलवर दुभंगला आहे आणि दरी अनुल्लंघनीय म्हणावी इतकी रुंदावली आहे.

आणखी एक गोष्ट घडली आहे. क्रांतिकारक समाजपरिवर्तन घडून आले तर ज्यांना पुष्कळ काही गमवावे लागेल

अशांची संख्या वाढली आहे. टक्केवारीच्या हिशोबात यांचे प्रमाण कदाचित जास्तीत जास्त दहाबारा टक्केच असेल; पण ही मंडळी सर्व क्षेत्रात व देशभर सर्वत्र मोक्याच्या जागा अडवून बसलेली आहेत. यांचे वैचारिक-सांस्कृतिक प्रभुत्व असल्याने आणखी पाच पंचवीस टक्के माणसे यांच्याबरोबर आहेत. भिकेचे तुकडेताकडे टाकण्याच्या चालीमुळे गोरगरीबांमधीलही अनेक जण या दहा-बारा टक्क्यांच्या भोवती घोटाळत असतात. आजचे राजकारण, अर्थकारण, समाजकारण बव्हंशी या वर्तुळातच आज चालते आहे; सारी व्यवस्था यांना लाभ पोचविण्यासाठीच राबविली जात आहे. न्याय, समता, शोषणमुक्ती यावर आधारित समाजाची भाषा वरिष्ठ दहा-बारा टक्क्यांमधील बरीच माणसे करीत असली तरी त्यांचे व्यवहार व जीवनशैली पाहता खऱ्या अर्थाने त्यांना समाजाची घडी बदलायला हवी आहे का असा प्रश्न पडतो.

**रचनात्मक कार्य व अनुभव**

तात्पर्य काय? आजची व्यवस्था ज्यांना लाभ-रिंगणाच्या बाहेर ठेवत आहे, ढकलत आहे, भिकेच्या तुकड्याच्या मोबदल्यात लाचार व परावलंबी गुलामी शिकवत आहे अशा शक्तिविहीन समूह, वर्गे, जाति-जमातींची ऐहिक-भौतिक शक्ती (मार्क्सच्या परिभाषेत Strength in materialist terms) वाढविण्याच्या विधायक विकासाच्या रचनात्मक कार्यक्रमाच्या माध्यमातूनच समाजपरिवर्तनासाठी आवश्यक त्या 'लोकशक्ती'चे जागरण व संघटन करावे लागेल.

पण अशी विकासाची कामे आजवर वंचित वा उपेक्षित राहिलेल्या समूहांना, वर्गांना, जाति-जमातींना वा क्षेत्रांना 'मुख्य प्रवाहा'शी जोडणारी असली तर? प्रस्थापित व्यवस्थेचा चंचूप्रवेश व विस्तार घडवून आणणारी असली तर? हक्क, मागण्या यावर आधारित बहुसंख्य आंदोलने व विकास प्रकल्प वस्तुतः हे कार्य पार पाडीत असतात. (हे ओळखूनच की काय आता भारत सरकारनेही स्वयंसेवी संस्थांना योजनाबद्ध विकासकार्यात सहभागी करून घ्यावयाचे धोरण अंगिकारले आहे.) तर अर्थातच अशा कार्यामधून दूरदृष्ट्या प्रस्थापित व्यवस्थाच मजबूत होईल. सर्वोदय चळवळीला याचा मोठा विदारक अनुभव खादी ग्रामोद्योग आयोगाच्या कामाच्या संदर्भात आहेच.

रचनात्मक असो वा आंदोलनात्मक, कोणतेही काम उभे करावयाचे असले तर मनुष्यबळ व साधने लागतात व ती जुळविण्यासाठी पैसा लागतो आणि पैशाचे सोंग आणता येत नाही. या अनिवार्यतेपोटी गेली अनेक वर्षे उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणात शासकीय योजनांखालील पैसा वा मोठ्या देशीविदेशी निधींचा पैसा यांचा आधार घेतला जात आहे. पण यामधून दुबळेपणाच वाढतोय असा अनुभव येतो. पैसा देणाऱ्या यंत्रणा बंधनांमध्ये अडकवितात म्हणून नव्हे, कारण आज अनेक परदेशी निधी संस्था तर 'संघर्षात्मक क्रांतिकर्म्या'चा आग्रह धरणाऱ्या आहेत. अशा कामांमधून मूलगामी समाजपरिवर्तनाच्या पाठीशी उभा राहणारा 'मतदारसंघ' बांधला जात नाही; उलट, तसा तो बांधण्याच्या गरजेला बगल दिली जाते. दुसरीकडे, ज्या लोकांची शक्ती अंतिमतः क्रांती घडवून आणणार आहे ते लोकही बाहेरून पैसे आणून वेगवेगळी कामे करणाऱ्या संस्था व संघटना यांच्यावर भार टाकण्याकडे प्रवृत्त होतात; परिवर्तन हा काही लोकांचा व्यवसाय बनू पाहतो. म्हणजे प्रस्थापित व्यवस्था परिवर्तनवादी कामेही स्वतःच्या चौकटीत सामावून घेते.

**तिहेरी आव्हान**

लोकशक्ती जागरणाच्या मार्गाने परिवर्तन घडवून आणण्याच्या भूमिकेस बद्धपरिकर असलेल्या साऱ्याच, पण त्यातही विशेषतः सर्वोदय चळवळीपुढे, अशा रीतीने, तिहेरी आव्हान आहे. उध्वस्त होत चाललेल्या ग्रामीण अर्थव्यवस्थेस व जनजीवनास सुस्थित व समर्थ बनविणाऱ्या रचनात्मक कार्यक्रमाचे प्रारूप सिद्ध करणे, अस्थापित व्यवस्थेचाच विस्तार व चंचूप्रवेश ठरणार नाही याप्रकारे त्याचा आशय व रूप आहे याची तपासणी करणे आणि यासाठी आवश्यक ते मनुष्यबळ व साधने यांची जुळवाजुळव करण्यासाठी लागणारा पैसा उभा करण्याच्या वेगळ्या पद्धती/रीती निश्चित करणे व त्या व्यवहारात यशस्वी करणे, असे तिहेरी आव्हान आहे असे म्हणता येईल.

**कार्यक्रमाची दिशा**

यासाठी लागणारा बहुतेक सारा 'ऐवज' महात्मा गांधी व आचार्य विनोबा यांच्या शिकवणुकीत व जीवनकार्यामध्ये साररूपाने उपस्थित आहेच. सगळाच विचार मुळापासून नव्याने करायला हवा आहे असे नाही. ग्रामदानी संरचना हा आदर्श, हे ध्येय झाले. आजच्या घडीला गावे यासाठी मनाने तयार नाहीत. पण जंगल, शेती, पाणी यासाठी साऱ्या गावाचा एकत्रित सामुदायिक विचार करण्यासाठी गावसमाजाला तयार करणे शक्य कोटीतले दिसते व हा रचनात्मक कार्यक्रमाचा कळीचा घटक (Key element) आहे असे म्हणता येईल. राळेगणसिद्धी, आडगाव, 'पाणीपंचायती'चे कार्यक्षेत्र व इतरही अशी उदाहरणे पाहता असे म्हणता येते की न्याय व समतेच्या दिशेने प्राथमिक ठोस पावले टाकण्यास गावाला, सगळ्या गावाला नाही तर काही कुटुंबांच्या समुदायाला तयार करता येते. पर्यावरणीय दृष्टीचा अंगिकार करून नैसर्गिक साधनांचे (जंगल, पशुधन, कुरण, पाणी इ.) संवर्धन, सूर्यउर्जेचा कमाल वापर करून व निसर्गाला अनुसरून केली जाणारी शेती (यात परसबागपण आली ) यांची योजना हा गाभा मानता येईल. या योजनेची सांगड गावातील सक्षम लोकांसाठी पर्याप्त प्रमाणात रोजगार निर्माण करण्याशी घालण्यास महत्त्व आहे. रोजगारांची निर्मिती हे उद्दिष्ट असे एकत्र आलेला गावसमुदाय ठरवील तेव्हा गांधीप्रणीत खादीला व इतरही ग्रामोद्योगांना त्यांचे योग्य व महत्त्वाचे स्थान प्राप्त होईल. पण उद्योग रुजण्याची व वाढण्याची गोष्ट सापेक्षतः अवघड, गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण करणारी व काही काळ घेणारी आहे. स्वाश्रयी सामर्थ्याच्या निर्मितीच्या दृष्टीने दुसरा निर्णायक महत्त्वाचा कार्यक्रम गांधीप्रणीत बुनियादी शिक्षणाचा आहे. समाजातले जास्त लोक उत्तरोत्तर शिक्षणापासून वंचित राहात आहेत. शाळा व महाविद्यालये यांचे जाळे पसरलेले असूनही. कारण या संस्थांद्वारे शिक्षण मिळत नाही. नोकऱ्या मिळविण्यासाठीदेखील सर्वसामान्यांना विशेष उपयोगाची न ठरणारी प्रमाणपत्रे तेवढी देण्याची ती व्यवस्था/यंत्रणा बनली आहे. बहुजन समाजाच्या अभ्युत्थानासाठी, त्यांच्या जीवनाशी, परिस्थितीशी व प्रश्नांशी जिवंत संबंध असलेल्या स्वाश्रयी व स्वायत्त शिक्षणाची नितांत गरज आहे. हे शिक्षण असरकारी असावे लागेल ही गोष्ट ओघानेच आली.

पैशाची उभारणी कशी करावयाची? सर्वोदयपात्र आणि संपत्तिदान अशा दोन कल्पना विनोबांनी चळवळीला प्रदान केल्या. त्या मौलिक व क्रांतिकारक आहेत. त्यांचा चिकाटीने, सातत्याने आणि सुजाणपणे पाठपुरावा केला गेला नाही

असे म्हटले तर वावगे होणार नाही. विनोबांच्या विचारांचे वळण मोडून त्यांच्या व जयप्रकाशांच्या नावे निधी गोळा केले गेले. ही फार मोठी तडजोड केली गेली, जीमुळे सत्व व सामर्थ्य यादृष्टीने चळवळीची फार मोठी हानी झाली. सर्वोदयपात्रात गरीबातला गरीब सहभागी होऊ शकतो तर संपत्तिदानात धनिकांना, सुखवस्तू मंडळींना त्यांचा वाटा ('संविभाग') उचलण्याची शिकवण मिळते. गांधींची विश्वस्त कल्पना व्यवहारात आणण्याची ती एक आरंभिक कृती ठरू शकते.

**सर्वोदय चळवळीपुढील आव्हान**

सर्वोदय चळवळ याच पायावर आज देशभर चालली आहे असा हवाला देता येईल की नाही, मला माहीत नाही. कोठे कोठे या वळणाने कामे होत असतील, हे शक्य आहे. ज्या प्रमाणात हे वळण अंगिकारले असेल त्या प्रमाणात लोकशक्ती जागरणाचा प्रत्यय येत असणार यात शंका नाही. अज्ञानामुळेही असेल कदाचित पण, 'तुझे आहे तुजपाशी' अशी वास्तविक गोष्ट असूनही, सर्वोदय चळवळ आज फुटकळ, विस्कळित व विघटित झाल्याने क्षीण, दुबळी बनल्यासारखी वाटते खरी. प्रत्यक्षात ती तशी नसेल तर प्रश्न नाही. एरवी वरील विवेचनातील काही मुद्दे विचारात घ्यावेत असे सुचवावेसे वाटते.

सर्वोदय चळवळीच्या प्रभावाने नाही, पण इतर काही कारणांनी, अनेकानेक माणसे गांधीजींच्या मार्गाकडे वळत आहेत असे मोठे आश्वासक दृश्य दिसते. लोकशक्तीवर आधारित समाजपरिवर्तनाच्या अहिंसक मार्गाचा शोध प्रामाणिक उत्कटतेने घेतला जात आहे. अशा सर्व माणसांना व त्यांच्या कार्यास जोडून घेण्याचे आव्हानही सर्वोदय चळवळीपुढे आहे.